Convertion in Regular Temparary Establishment:- Shri Tukaram.S Khade working under Koyana Bandhakam Circle

कार्यव्ययी व रोजंदारी आस्थापनेवरील पदांचे अस्थायी आस्थापनेवरील पदांमध्ये रुपांतरण-- **श्री. तुकाराम एस खाडे, कोयना बांधकाम मंडळ , सातारा.**

**महाराष्ट्र शासन**

जलसंपदा विभाग

शासन निर्णय क्र. एसयुटी-२००४/ (२०४/२००४)/आ(कामगार)

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक :- २५/५/२०११

**पहावे** :- १) शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग रु.अ.आ.१५९६/२२८/ सेवा-५, दि.२४.४.२००१

२) अधीक्षक अभियंता, घाटघर जलविद्युत प्रकल्प मंडळ, नाशिक. यांचे पत्र जा. क्र. घाजविप्रम/आ-२/३१७०/०९ दिनाक ४/७/२००९.

**प्रस्तावनाः**

अधिक्षक अभियंता, घाटघर जलविद्युत प्रकल्प मंडळ, नाशिक यांच्या नियंत्रणाखालील विभागीय कार्यालय, यांनी श्री. तुकाराम श्रावण खाडे यांची दि २१.१०.८२ रोजी रोजंदारी आस्थापनेवर मजूर म्हणून नियुक्ती केली होती. दि २१.६.८६ रोजी कामाअभावी त्यांना कामावरुन कमी करण्यात आले होते. त्यामुळे त्यांना सेवेत पुन्हा घेण्याबाबत, मा. कामगार आयुक्त, नाशिक यांनी सदर प्रकरणी मध्यस्थी केली असता, श्री. खाडे व क्षेत्रीय अधिकारी यांच्यात समेट होऊ न शकल्यामुळे मा. कामगार आयुक्त नाशिक यांनी मा. कामगार न्यायालय, अहमदनगर येथे् दावा दाखल करण्याचे निर्देश संबंधित कार्यालयास दिले त्यानुसार मा. कामगार न्यायालय, अहमदनगर येथे दावा क आयडीए ३७/९३ अन्वये दाखल करण्यात आला. सदर दाव्याचा अंतिम निर्णय दि २४.५.९६ रोजी लागला या निर्णयान्वये कामगारास दि १०.८.९२ पासून सेवासातत्यासह परंतु मागील कोणतीही थकबाकी न देता सेवेत पुनःस्थापित करण्याचा आदेश दिला. सदर न्यायनिर्णयाविरुध्द शासनाच्यावतीने मा. उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे रिट पिटीशन क : ६८८/९७ दाखल करण्यात आला. सदर दावा विहीत मुदतीत न केल्यामुळे फेटाळण्यात आला. नंतर सदर दावा पुर्नजिवित करण्यासाठी शासनातर्फे सिव्हिल ॲप्लीकेशन नं. ३२१४/१९९९ दाखल करण्यात आले असता, सदर दावा न्यायालयाने नाकारला. सद्यस्थितीत श्री. तुकाराम खाडे यांना मा. कामगार न्यायालयाच्या दि. २४.५.९६ च्या निर्णयाची अंमलबजावणी करण्यासाठी दि १८.११.९६ पासून सेवेत पुनःस्थापित केले आहे. सदर निर्णयानुसार कोणतीही मागील थकबाकी न देता दि १०.८.९२ पासून सेवासातत्य दिल्यामुळे श्री. खाडे यांना दिद २४.४.०१ मधील तरतुदीनुसार मजुर या पदावर रुपांतरीत अस्थाई आस्थापनेवर घेण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

श्री. खाडे यांना दि १०.८.९२ दिनांकापासून सेवासातत्य दिल्यामुळे एका वर्षाच्या कालावधीत एकूण त्यांची २४० दिवस इतकी सेवा झाली आहे. शासन निर्णय दि २४.४.२००१ मधिल तरतुदीनुसार श्री. खाडे यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेण्याचा दिनांक ( १०.८.९७ ) हा दिनांक ३१.१२.९८ पूर्वीचा असल्याने श्री. तुकाराम श्रावण खाडे यांना खालीलप्रमाणे अस्थायी आस्थापनेवर रुपांतरीत करण्यात येत आहे.

| अ. क्र | कर्मचाऱ्यांचे नाव | आस्थापनेचा प्रकार | प्रथम नियुक्तीचे पद व दिनांक | रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणावयाचा दिनांक | रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घ्यावयाचे पद | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | श्री. तुकाराम श्रावण खाडे | रोजंदारी | मजूर १०.८.९२ | १०.८.९७ | मजूर | रु. रु.७५०-९४० (जुनी) रु.२५५०-३२०० (५ वा वेतन आयोग ) |

३. श्री. तुकाराम श्रावण खाडे यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणल्यामुळे त्यांना पुढील सवलती देण्यात येत आहेत :-

अ) अस्थायी आस्थापनेवर रुपांतरीत केलेल्या पदांकरिता सेवाप्रवेश नियमानुसार वा अन्य प्रकारे विहित करण्यात आलेली किमान/कमाल वयोमर्यादेची व चतुर्थश्रेणी कर्मचाऱ्यांचे बाबतीत शैक्षणिक अर्हतेची अट शिथिल करण्यांत येत आहे.

ब) नेमणूक सेवायोजन कार्यालयाच्या शिफारशी व्यतीरिक्त अन्य मार्गाने झालेली असल्यास, सेवायोजन कार्यालयामार्फत भरती करण्याची अट देखिल शिथिल करण्यात येत आहे.

क) स्वास्थ्य प्रमाणपत्र सादर करण्याच्या अटीतून त्यांना सूट देण्यांत येत आहे.

४. अधीक्षक अभियंता, यांनी या आदेशातील सर्व अटी व शर्ती विचारात घेऊन कोणत्याही त्रुटी राहणार नाहीत याची दक्षता घ्यावी आणि योग्य ते सविस्तर आदेश या शासन निर्णयाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत नर्गमित करुन ते संबंधित कर्मचाऱ्यांच्या निदर्शनास आणावेत. तपशिलामध्ये संबंधित कर्मचाऱ्यांचे नांव , पदनाम, त्याच्या प्रथम नियुक्तीचा दिनांक त्याला रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर ज्या दिनांकापासून आणण्यात आले आहे तो दिनांक यामध्ये कोणतीही चूक वा त्रुटी आढळून आल्यास क्षेत्रिय अधिकाऱ्यांनी अशी बाब शासनाच्या निदर्शनास तात्काळ आणावी. क्षेत्रिय अधिकाऱ्यांनी सदर आदेशात स्वतःच्या अधिकारात कोणतेही फेरबदल करु नयेत, तसेच हे आदेश संबंधित कर्मचाऱ्याच्या व्यक्तीशः निदर्शनास आणून शासनाने निर्गमित केलेल्या आदेशांच्या बाबतीत संबंधित कर्मचाऱ्याची (नाव, पदनाम, त्याच्या प्रथम नियुक्तीचा दिनांक तसेच रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणण्याच्या दिनांकात दुरुस्ती इ. बाबतीत) कोणतीही तक्रार नसल्यास त्याच्याकडून तशा आशयाचे शासन निर्णय दि. २४.४.२००१ सोबतच्या प्रपत्र 'ब' मधील नमुन्यात हमीपत्र (Undertaking) घेवून ते त्या कर्मचाऱ्यांच्या सेवापटात /सेवापुस्तकात चिकटवून ठेवावे आणि ही सर्व कार्यवाही पूर्ण केल्याचा अनुपालन अहवाल या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्याच्या आत_शासनाकडे पाठविला जाईल याबाबतीत संबंधीत अधीक्षक अभियंत्यांनी सतर्क रहावे. या आदेशामध्ये काही तफावत /त्रुटी असल्याची संबंधित कर्मचाऱ्यांची तक्रार असल्यास अशी तक्रार त्यांच्याकडून लेखी स्वरुपात घ्यावी आणि आपल्या कार्यालयाच्या अभिप्रायासहित दुरुस्तीचा प्रस्ताव या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्याच्या आत शासनाकडे पाठविला जाईल याची दक्षता घ्यावी. दुरुस्ती प्रस्ताव पाठवितांना संबंधित कर्मचाऱ्यांच्या नेमणुकांच्या आदेशांच्या प्रती, हजेरी पटाच्या प्रती, आणि सेवापट पाठविण्याची खबरदारी घ्यावी.

५.	श्री. तुकाराम श्रावण खाडे यांना मजुर या पदावर रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेतल्याच्या दिनांकापासून ते दि.९.८.९८ या एक वर्षाच्या कालावधीतील देय होणा-या वेतन व भत्त्याच्या थकबाकीच्या रकमेपैकी १०० टक्के रक्कम ते स्वखुशीने सोडून देण्यास तयार असल्याचे हमी पत्र लिहून दिले आहे. त्यामुळे त्यांच्या सदरहू कालावधीतील वेतनाच्या फरकाची रक्कम अनुज्ञेय असणार नाही. दि १०.८.९८ पासून वेतन व भत्याच्या थकबाकीची रक्कम श्री. खाडे यांना अनुज्ञेय होईल . तसेच त्यांची वेतन निश्चिती त्यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेतल्याच्या दिनांकापासून करण्यात यावी.

६.	दि. १०.८.९८ पासून दि. ३१.८.२००० पर्यंतच्या वेतनवाढीच्या फरकाची रक्कम (सर्व भत्यासहीत) दहा समान वाषिक हप्त्यात देण्यात यावी. सदर कर्मचा-यास वेतन व भत्याच्या थकबाकीच्या रकमेचा पहिला हप्ता सन २०११-१२ मध्ये देण्यात यावा. तसेच थकबाकीची सर्व रक्कम सन २०१२-१३ या आथिक वर्षापासून त्या त्या वर्षाच्या जून महिन्यात संबंधित कर्मचा-याच्या भविष्य निर्वाह निधीत एकूण १० (दहा) हप्त्यात जमा करावी.

७.	दि. १.९.२००० नंतर या आदेशाच्या दिनांकापर्यंतच्या वेतनाच्या फरकाची रक्कम संबंधित कर्मचा-यांस रोखीने द्यावयाची असून ती धनादेशाद्वारे (Cheque ) अदा करावयाची आहे.

८.	या प्रस्तावातील खर्च सन २०११-२०१२ या आर्थिक वर्षात संबंधित लेखाशिर्षाखाली मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा व आगामी वर्षापासून हप्त्याने द्यावयाच्या रकमेची तरतूद त्या त्या वर्षीच्या अर्थसंकल्पात करावी.

९.	हे आदेश शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र. रुअआ १५९६/२२८/सेवा-५, दि. २४ एप्रिल २००१ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करुन काढण्यात येत आहेत.

१०.	हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर सांकेतांक कमांक : २०११०५२५११०८२१००१ अन्वये प्रसिध्द करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

सोबतः प्रपत्र ब

अ.अ.कोदे

**( अ.अ.कोदे )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत :-**

वित्त विभाग (व्यय १२), मंत्रालय, मुंबई
महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र १, मुंबई / महाराष्ट्र- २, नागपूर
महालेखापाल, लेखा परिक्षा , महाराष्ट्र -१,मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर
अधिक्षक अभियंता, कोयना बांधकाम मंडळ, सातारा.
कार्यकारी अभियंता, घाटघर उदंचन जलविद्युत प्रकल्प विभाग क १ जि. ठाणे
आस्थापना(कामगार) संग्रहार्थ.